

शत्रूची
भेट
ट्रुडी लुडविग
मराठी: अश्विनी बर्वे

“मी असाधारण भूतकाळ असणारा, एक खूप साधारण व्यक्ती आहे.”

या खऱ्या आणि हृदयाला स्पर्शून जाणाऱ्या कहाणीत द्वितीय विश्व युद्धाच्या दरम्यान नाझी यातना आणि मृत्यु शिबिरात एक जीव वाचलेला माणूस, ऑल्टर वाईनर, युवा वाचकांना या घटनेच्या बाबत सांगत आहेत.जेव्हा एक अनोळखी व्यक्ती त्यांच्या प्रती परत परत दयाभाव दाखवण्याचे नैतिक साहस केले आणि आपला जीव संकटात टाकला.

“मी स्वतःला विचारले,तो अनोळखी माणूस माझ्यासाठी एकदा नाही तर ३०वेळा जीव धोक्यात टाकण्यास का तयार झाला असेल? माझ्यासाठी त्याने एवढे का केले?”

“शत्रूची भेट” हे पुस्तक दाखवून देते की सामाजिक न्याय आणि दयाभाभावाचे काम कोणाचेही जीवन कसे बदलू शकते. आईवडील आणि शिक्षक यांना या कहाणीतून एक मूल्यवान संसाधन मिळेल. ज्यातून मुलांना एक उपयोगी प्रकाराची घृणा, रूढीवादी आणि पूर्वग्रह याबाबतचे धोका समजण्यास मदत होईल.

# शत्रूची भेट


इुडी लुडविग

चित्र: क्रेग



काही लोक म्हणतात की मी जे सत्य अनुभवले ते कधी घडलेच नाही. पण मी इथे हे सांगू इच्छितो की माझ्या जीवनात ते सगळं घडलं. माझे नाव ऑल्टर वाईनर आहे आणि मी असाधारण भूतकाळ असणारा, एक खूप साधारण व्यक्ती आहे.

खूप वर्षापूर्वी मी तुमच्यासारखा एक छोटा होतो. मी माझ्या परिवाराच्या बरोबर पोलंडच्या दक्षिण-पश्चिम कोपऱ्यातील शहरात राहत होता.

त्याकाळी, आमच्या घरात नळाच्या सहाय्याने पाणी येत नसे. आमच्या जवळ रेफ्रिजरेटर, सेल फोन, टिव्ही, कंप्यूटर नव्हते.आमच्याजवळ कार नव्हते. आम्ही साधारणपणे पायीच कुठेही जात असू..



आम्ही खूप साधे सरळ जीवन जगत होतो. तरीही आमचे घर पुस्तके, जेवण, हास्य आणि प्रेमाने भरलेले होते.





प्रत्येक शुक्रवारी बाबा एका गरीब विद्यार्थ्याला किंवा एखाद्या बेघर व्यक्तीला आमच्या बरोबर सबॅथ (यहूदी सुट्टीचा दिवस) चे जेवण जेवण्यासाठी बोलवत असत. सूर्यास्त्याच्या वेळी आम्ही सबॅथच्या स्वागतासाठी मेणबत्ती लावत असू आणि प्रार्थना करत असू. त्यानंतर आम्ही आईने केलेले  गरम पदार्थ खात असू. मी ताज्या गरमागरम पावाचा तुकडा खाण्यासाठी थांबू शकत नसे. त्याचा एक एक तुकडा स्वर्गीय असे.

आई कमालीचा स्वयंपाक करत असे. ती स्वयंपाकघरात तासनतास घालवत असे आणि बाबा. माझे भाऊ शमूएल, हिर्श आणि माझ्यासाठी स्वादिष्ट जेवण तयार करत असे.

माझी आई खूप उदार होती. “थंडीशी मुकाबला करण्याचे दोन प्रकार असतात,” ती नेहमी म्हणायची. “स्वतःला गरम ठेवण्यासाठी तुम्ही फरचा कोट घालू शकतात, किंवा मग शेकोटी पेटवू शकतात. त्यामुळे दुसऱ्यांना सुद्धा ऊब मिळेल.”

आईने ठरवले होते की आपण आपल्यापेक्षा कमी भाग्यशाली लोकांना जेवण आणि आश्रय द्यायचा-शांततेच्या काळात सुद्धा आणि युद्धाच्या काळात सुद्धा.





१ सप्टेंबर १९३९ ला जर्मन नाझी सैनिकांनी आपला नेता हिटलरच्या आदेशानुसार माझ्या देशावर पोलंडवर कब्जा केला. पोलंडची सेना एवढी बळकट नव्हती की ती आमच्या देशांचे आणि लोकांचे रक्षण करू शकेन. हजारो लोकांनी पळण्याचा प्रयत्न केला, ज्यात माझा परिवार सुद्धा सामील होता, पण आमच्याकडे जाण्यासाठी जागाच नव्हती. हिटलरच्या सेनेने चारी बाजूला आम्हांल घेरले.

माझे वडील एक विचारशील शांत स्वभावाचे व्यक्ती होते. वडिलांनी मला आणि माझ्या भावांना तिरस्काराचा अस्वीकार करण्यास शिकवले. दुसऱ्या बाजूला हिटलरने आपल्या लोकांना तिरस्कार करायला शिकवले.

त्यांचा तिरस्कार शब्दांनी सुरु झाला. सुरुवातीला त्यांनी दुखवणारे शब्दांचा वापर केला नंतर शेजारी आणि अनोळखी लोकांवर ओरडायला सुरुवात केली. त्या शब्दांमुळे अनेक लोकांच्या ह्दयात आणि डोक्यात तिरस्कारची मुळे पेरली आणि त्यामुळे लोक अधिकाधिक वाईट वागू लागले.

जेव्हा हिटलर सत्तेत आला,त्याने आपल्या सैनिकांना अशा लाखो लोकांना शोधण्याचा, कैद करण्याचा आणि मारण्याचा आदेश दिला. अशा म्हाताऱ्या आणि तरुण लोकांना, जे हिटलरच्या लोकांपेक्षा वेगळे दिसत होते, विचार करते होते आणि काम करत होते. हिटलर भिन्न मतांचा तिरस्कार होता..

जर्मन सेनेचा आमच्या शहरावरचा  कब्जा प्रत्येकासाठी म कठीण होता,पण तो यहुदी लोकांसाठी सगळ्यात जास्त कठीण होता. कारण हिटलरच्या तिरस्काराच्या यादीत ते सगळ्यात वर होते.

आमचे स्वातंत्र्य आणि आमचे अधिकार काढून घेतले गेले.

आमची मुले शाळेत जाऊ शकत नव्हते.

आम्ही आमच्या पूजा घरामध्ये प्रार्थना करू शकत नव्हतो.

आम्ही आमच्या आवडीच्या बागेत किंवा खेळाच्या मैदानावर जाऊ शकत नव्हतो.

कर्फ्यूमुळे आम्ही आमच्या घरात आम्ही कैदी झालो.



या तिरस्कारामुळे अनेक चांगल्या आणि सभ्य लोकांनी आपला जीव गमावला. ज्यात माझे मित्र आणि त्यांच्या कुटुंबातील सदस्य सामील होते.

मी १३ वर्षाचा होतो जेव्हा जर्मन सैनिकांनी माझ्या शहरात परेड केली आणि त्यांनी माझ्या वडिलांना मारून टाकले.

मी १४ वर्षाचा होतो, तेव्हा अर्ध्या रात्री ते आमच्या घरात घुसले आणि माझा भाऊ शमूएलला ते घेऊन गेले.



मी १५ वर्षाचा होतो तेव्हा नाझी माझ्यासाठी आले होते.मला आईला आणि माझ्या छोट्या भावाला हिर्शला भेटण्याची संधी मिळाली. त्यांची ही माझी शेवटची भेट होती. त्यानंतर मी त्यांना कधीही बघितले नाही.

मला आणि अनेक लोकांना दया, करुणा, सन्मान आणि अभिमानापासून दूर एका यातना शिबिरात मालगाडीच्या डब्यातून ट्रेनने गुरांसारखे घेऊन गेले.



मला सतत खूप गर्दीतून एका घाणेरड्या तुरुंगातून दुसऱ्या तुरुंगाच्या लेबर कॅम्पमध्ये पाठवले जाई. मला रोज खूप तास काम करावे लागत असे. रक्षकांनी कैदयाबरोबर क्रूर व्यवहार केला आणि दया दाखवली नाही. कैद्यांना खाण्यासाठी पुरेसे नसे ते नेहमी भुकेले असत. जेव्हा मला खूप भूक लागलेली असे तेव्हा मी आई आणि तिने तयार केलेले पदार्थांचा विचार करत असे. मी घरी केलेल्या पावाचा छोटा तुकड्याची चव घेण्यासाठी काहीही करायला तयार होतो.

अशाप्रकारे महिने निघून गेले. मग वर्षापासून अन्नाची कमी असल्याने माझे पोट रिकामे राहिले आणि माझे हृदय जड झाले.

आता माझ्याजवळ फक्त एक दोन दिवस जिवंत राहण्याची ताकद आणि इच्छाशक्ती राहिली होती. तेव्हा माझ्याबरोबर काहीतरी आश्चर्यकारक घडले. मला एका अनोळखी व्यक्ती कडून भेट मिअली आणि कोणी सामान्य अनोळखी नव्हता. तो एक असा अनोळखी होता ज्याला मी माझा शत्रू समजत होतो.

गोष्ट त्याकाळातली आहे जेव्हा मी एका जर्मन फॅक्टरीमध्ये काम करत होतो. कारखान्याच्या दरवाज्यावर सगळे जर्मन कर्मचारीसाठी खालील धमकी लिहिली होती.

कैद्यांकडे बघू नका.

कैद्यांशी बोलू नका.

कैद्यांना काही देऊ नका.

जर कोणी असे केले

तर त्याचे आयुष्य बरबाद होईल..

एक दिवस, एका जर्मन कर्मचारयाने माझ्याकडे बघितले.जेव्हा माझे लक्ष त्याच्याकडे गेले तेव्हा त्याने फरशीवर पडलेल्या डब्याकडे बोटाने इशारा केला. जिज्ञासेने मी त्याठिकाणी तेव्हा गेलो जेव्हा माझ्याकडे कोणी बघत नव्हते. आणि मी तो डबा उघडून बघितला.



मला काय मिळाले? ती सगळ्यात सुंदर भेट होती जिचे मी स्वप्न बघत होतो. ब्रेड आणि पनीरचे सँडविच! माझा माझ्या डोळ्यांवर विश्वास बसत नव्हता. मी सँडविच उचलले आणि कोणी बघण्याच्या आधी मी ते खाऊन टाकले.

यापेक्षाही आश्चर्याची गोष्ट ही की त्या जर्मन महिलेने माझ्यासाठी पुढचे ३० दिवस (जोपर्यंत मी तिथे काम करत होतो) रोज त्या डब्यात एक ब्रेड आणि पनीरचे सँडविच ठेवले!





का? मी स्वतःला विचारले, तो अनोळखी व्यक्तीने माझ्यासाठी एकदा नाही तर ३० वेळा आपला जीव धोक्यात घालायला तयार का झाली? माझ्यासाठीच का? त्या महिलेला माझ्या वयाचा कोणी मुलगा होता का? कदाचित त्यामुळे तिला माझी दया आली असेल? की ती एक धार्मिक व्यक्ती होती जी असे मानत होती की असहाय्य लोकांना मदत करणे हेच तिचे धार्मिक कर्तव्य होते?

आजपर्यंत तिचे मला खाऊ घालण्याचे कारण मला कल्ले नाही. मला माहीत नाही की तिने मला उर्जा का दिली आणि जिवंत राहण्याची आशा का निर्माण केली. पण तिच्या दयाळू वागण्याने मला विचार करायला भाग पाडले, की मी कसा विश्वास ठेवू की माझे शत्रू जर्मन आहेत, जेव्ह त्या जर्मन महिलेने माझ्यासाठी स्वतःचा जीव धोक्यात घातला? तेव्हा मी जीवनातला सगळ्यात महत्वाचा धडा शिकलो: लोकांच्या कोणत्याही समुहात न्हेमी काही दयाळू आणि काही क्रूर लोक असतात.आपण जीवनात कोणत्या लोकांना भेटतात आणि तुमच्याबरोबर ते कसा व्यवहार करतात, ते अधिक महत्वपूर्ण असते की कोणता देश, वंश जात अधिक महत्वाचे असते?

मे १९४५ मध्ये रशियन सेना आमच्या शिबिरात पोहचली आणि त्यांनी आम्हांला सांगितले की युद्ध संपले आहे आणि जर्मनी युद्धात हरला आहे आणि आता शेवटी आम्ही मुक्त झालो. मी माझ्या शूर जर्मन नायिकेला भेटण्याचा आणि तिचा पत्ता शोधण्याचा खूप प्रयत्न केला, पण मी तिला शोधू शकलो नाही. तरीही एक दिवसही मी असा घालवला नाही जेव्हा मी तिचा विचार केला नाही. रोज मी तिच्या साहसाला आणि तिने दाखवलेल्या दयेला धन्यवाद म्हटले.



युद्ध संपून अनेक वर्षे झाली. मी आता खूप म्हातारा झालो आहे, पण माझ्या भूतकाळातील आठवणी अजूनही ताज्या आहेत. प्रत्येक शुक्रवारी सूर्यास्ताच्या वेळी मी शमबाथचे स्वागत मेणबत्ती लावून करतो, त्यानंतर शुभ भोजनाची पूजा करतो. आता जेव्हा मी पावाचा तुकडा कापतो तेव्हा फक्त स्वर्गीय चव लागत नाही तर त्याबरोबर मला स्वातंत्र्याची चव सुद्धा लागते.



## शेवटचे शब्द

एक जुनी म्हण आहे की हुशार लोक आपल्या स्वतःच्या अनुभवातून शिकतात पण एक बुद्धिमान व्यक्ती दुसऱ्यांच्या अनुभवातून शिकतो. खूप लोक चर्च मध्ये, प्रार्थनालयात आणि शाळेत माझे सादरीकरण ऐकले आहे, त्याचबरोबर माझी आत्मकथा वाचली आहे, त्यांनी व्यक्तिगत मला सांगितले की माझ्या जीवनाची कहाणी त्यांच्या जीवनात सकारात्मक प्रभाव टाकते. “तुमची कहाणी सगळ्यांनी मोठे आणि तरुणांनी दोघांनी परत ऐकायला हवी,” त्यांनी मला सांगितले की “वर्तमान आणि येणाऱ्या पिढ्यांना हॉलोकॉस्ट ला लक्षात ठेवायला हवे, त्यातून शिकायला हवे आणि परत असा नरसंहार होऊ नये,त्याला थांबवण्यासाठी शक्य तेवढे प्रयत्न करायला हवे.”

**तिरस्काराची कोणतीही सीमा नसते.** द्वितीय विश्व युद्धात प्रत्येक यहूदी एक शिकार होता, पण हिटलरच्या हिट-लिस्टमध्ये यहूदी, पुजारी, मौलवी, रोमा, एफ्रो-जर्मन, रूसी, चेक, पोल, सर्ब, राजनीतिक असंतुष्ट लोकांशिवाय विकलांग लोक सुद्धा होते. कारण हिटलरचे असे म्हणणे होते की जर्मन लोकच एकमेव श्रेष्ठ मानव आहेत, ज्यांना त्याने “आर्य” म्हटले, त्याने सगळ्या गैर आर्य लोकांना अमानवीय मानले. विशेषतः त्याने यहूदी लोकांना नष्ट करण्यासाठी सर्व काही केले. काही जर्मन लोकांनी आपल्या नेत्याचे म्हणणे पटत नसतांना देखील शिक्षा होण्याच्या भीतीने हिटलरच्या जातिवादी विचारधारेच्या पुढे गुडघे टेकले.

"शत्रुची भेट” पुस्तक वाचक मुलांनी हा अनुभव घेतला नसेल जे मी एक तरुण म्हणून सहन केले. उदाहरण म्हणून, वाल्डनबर्ग यातना शिबिरात नाझींनी माझे नाव ओढून घेतले आणि मला फक्त नंबर दिला. मला थंडीपासून वाचण्यासाठी गरम कपडे, मोजे आणि बूट देण्या ऐवजी मला कपड्याचा केवळ एक जोड आणि लाकडाची फळी मिळाली. माझे अंथरून बिना गादीचे, उशीचे वा चादरीचे होते तिथे फक्त लाकडाची फळी होती. जी माझा पलंग आणि खुर्ची म्हणूनही उपयोगात येई. माझ्याजवळ कोणताही कप किंवा ग्लास नव्हता. मला जे थोडेसे खायला मिळत असे, त्यासाठी एकमेव भांडे होते. माझ्याजवळ टॉवेल, कंगवा, टूथ ब्रश नव्हता. मी कधीही माझा चेहरा आरश्यात बघू शकत नव्हतो कारण माझ्याजवळ आरसा नव्हता. त्याऐवजी माझे डोळे सगळीकडे मानवी पिडा बघू शकत होते.

माझ्या किशोरावस्थेच्या काळात मी माझे जीवन जगू शकलो नी, मी फक्त जिवंत राहिलो.मला फक्त मरण्याचा अधिकार होता. पाच वर्षा पर्यंत माझ्यावर रोज अत्याचार झाले-मी जे केले त्यासाठी नाही तर मी केवळ एक यहुदी आहे म्हणून.

मला आशा आहे की "शत्रुची भेट” युवकांना हे समजण्यास मदत करेन की दुष्ट आणि भले लोक सर्व समुहात आणि समाजात असतात. कोणत्याही समाजाला एकसारखे समजणे अन्यायकारक आहे. कोणाला माहीत की आमची सभ्यता किती पुढे गेली असती जर त्यांना मारण्याच्या ऐवजी फळू फुलू दिले असते तर? आजच्या मुलांसाठी माझी प्रबळ इच्छा आहे की ते हे जग सगळ्यांसाठी सुंदर, अधिक काळजी घेणारे जग करण्यासाठी प्रयत्न करतील.

*ऑल्टर वाईनर, फ्रॉम ए नेम टू ए नंबर - एक होलोकॉस्टमधून वाचलेल्या व्यक्तीची आत्मकथेचे लेखक*

## युद्धात प्रलय आणि एक जग

*होलोकॉस्ट* द्वितीय विश्व युद्धाच्या काळात जवळजवळ साठ लाख यूरोपीय यहूदीचा छळ आणि त्यांच्या सामुहिक हत्येसाठी वापरला जाणारा शब्द आहे.जेव्हा १९३०च्या दशकाच्या सुरुवातीला नाझी पार्टीचे नेता अडॉल्फ हिटलर जर्मनी मध्ये सत्तेवर आला,त्याने आणि त्याच्या समर्थकांनी मुख्यतः यहुदी लोकांना त्यांच्या देशाची समस्या ठरवले दोषी ठरवले.त्यांना नीच जातीतले मानले. त्याने आपल्या अनुयायींना सांगितले की यहुदी लोक जर्मन राष्ट्रासाठी धोकादायक आहेत.हिटलरने लाखो निर्दोष पुरुषांवर,महिलांवर आणि मुलांवर अत्याचार करण्याचा मार्ग मोकळा केला.

१९३९ ते १९४५ पर्यंत चाललेल्या युद्धात केवळ युरोपीय यहुदीच नव्हते ज्यांनी हिटलर आणि त्याच्या सहकार्यांच्या प्रभुत्वाचा सामना केला,ज्यात अनेक राष्ट्र होते .ज्यामुळे जगभरात ५ कोटीहून अधिक लोकांचे जीव गेले.पूर्ण युरोप, उत्तर आफ्रिका,आशिया,अटलांटिक आणि प्रशांत महासागर बरोबर भूमध्य सागरात पसरलेली लढाई बरोबर द्वितीय विश्व युद्धाला मानव जातीच्या इतिहासातील सगळ्यात व्यापक, विनाशकारी युद्ध समजले जाते.